शैक्षणिक वर्ष २०१०-११ नवीन कला संस्थांना मान्यता व मान्यताप्राप्त कला संस्थांमध्ये वाढीव अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एडीआर-२०१०/(१८५/१०)/ तांशि-६,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक :- १६ ऑगस्ट २०१०**

**वाचावे:-** कला संचालनालयाचे क्र.पीअेआय -२०१०/दोन/१०४१ , दि. २८ मे २०१० चे पत्र

**प्रस्तावना :-** कला संचालनालयाने सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षामध्ये प्राप्त झालेल्या नवीन - कला संस्थांना मान्यता व मान्यताप्राप्त कला संस्थांना वाढीव अभ्यासक्रमास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. एकूण नवीन ४१ संस्थाचे प्रस्ताव व २१ जुन्या संस्थांना वाढीव अभ्यासक्रम सुरु करण्यास मंजूरी देण्याबाबतचे प्रस्ताव कला संचालनालयास प्राप्त झाले होते. सदर प्रस्तावाची तपासणी करुन टास्क फोर्स समितीने विहीत अटी व शर्ती नुसार १८ नवीन कला संस्थांतील ३१ अभ्यासक्रमास व जुन्या १८ कला संस्थांतील २६ वाढीव अभ्यासक्रमास मान्यता देण्याबाबतची शिफारस केली आहे. उर्वरीत संस्था अटी व शर्ती पुर्ण करीत नसल्याने टास्क फोर्स समितीने त्यांची शिफारस केलेली नाही. शिफारस केलेल्या संस्थांचे प्रस्ताव तपासून त्याअनुषंगाने नवीन कला संस्थांना मान्यता देणे व वाढीव अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** शैक्षणिक वर्ष २०१०-११ करीता सोबतच्या विवरणपत्र 'अ' मध्ये नमुद केलेल्या एकूण १८ इतक्या नवीन खाजगी कला संस्थांमध्ये ३० नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास

तसेच विवरणपत्र 'ब' मध्ये मान्यता प्राप्त १८ खाजगी कला संस्थांमध्ये २६ वाढीव अभ्यासक्रम सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या शासन निर्णयातील सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ २ मध्ये दर्शविलेल्या संस्थांना स्तंभ ४ मध्ये नमुद केलेल्या अभ्यासक्रमास व स्तंभ-५ मधील प्रवेशक्षमतेसह खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर मंजूरी कायम विनाअनुदान तत्वावर देण्यात येत आहे.

२) संस्थेची प्रवेशक्षमता स्तंभ - ५ मध्ये दर्शविल्यानुसार मर्यादित असेल.

३) विनाअनुदानित कला संस्थाना मान्यता देताना शासनाने विहीत केलेल्या सर्व अटी व शर्ती संस्थांना बंधनकारक असतील. याबाबतचा करारनामा संस्थेने १००रु.च्या स्टॅम्प पेपरवर करणे बंधनकारक असेल. तसेच आवश्यक त्या सर्व कागदपत्रांची व औपचारीक बाबींची पूर्तता संचालक कला यांच्या संमतीनुसार समाधानकारकरीत्या करण्यात यावी.

४) भविष्यात शासनाने खाजगी, अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित संस्थेने शासनाची संलग्नता घेणे अनिवार्य असल्याबाबत निर्णय घेतल्यास, त्याबाबतचे शुल्क भरुन संबधित संस्थेने संचालक, कला संचालनालय, यांची संलग्नता घेणे आवश्यक अनिवार्य असेल.

५) संस्थेने, विद्यार्थ्यांना अद्ययावत शैक्षणिक सुविधा पुरविणे, त्यांच्या प्राथमिक गरजा पुर्ण करणे तसेच त्यांचा गुणात्मक दर्जा वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक सर्व साधनसामुग्री उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

६) संस्थेमध्ये किमान १० विद्यार्थी संख्या असणे बंधनकारक असेल याबाबत सतत २ वर्षे संस्थेची तपासणी करुन मानकानुसार सलग २ वर्षे संस्थांनी विद्यार्थीसंख्येची अट पुर्ण न केल्यास तीस-या वर्षी संस्थेची मान्यता ठेवावी किंवा कसे याबाबत संचालक, कला संचालनालयामार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा. सदर प्रस्तावानुसार सदर संस्थेबाबतचा निर्णय घेण्यात येईल.

७) शासनमान्य संस्था, संचालक, कला संचालनालय यांच्या नियंत्रणाखाली राहतील. संस्थेबाबत कोणत्याही बाबतीत तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची तपासणी करण्याचा तसेच निर्णयाप्रत येण्याचा अधिकार शासनास असेल.

८) विद्यार्थी प्रवेशानुसार व विहित मानकानुसार त्या त्या अभ्यासक्रमातील शैक्षणिक अर्हता धारण केलेला तज्ञ अध्यापक वर्ग संस्थेने नियुक्त करणे बंधनकारक असेल.

९) भविष्यात शासनाने प्रवेश पध्दती, परिक्षा पध्दती, याबाबत कोणताही निर्णय घेतल्यास संस्थेतील प्रवेश परीक्षा पध्दती इत्यादीबाबत शासनाने मान्य केलेल्या संबधीत अभ्यासक्रमाच्या बाबतीत केलेली सुधारणा संस्थाना बंधनकारक असेल.

१०) राज्य शासन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग व संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घालून दिलेल्या अटी व शर्ती सर्व संस्थांना लागू राहतील.

११) संस्थेने दरवर्षी वार्षीक अहवाल व लेखा परीक्षा अहवाल तयार करुन घ्यावा व तसा अहवाल शासनास सादर करणे बंधनकारक असेल.

१२) विद्यार्थ्यांसाठी पुरविण्यात येणा-या पायाभूत प्राथमिक सोयीसुविधा व शैक्षणिक सोयीसुविधांची उपलब्धता तसेच संस्थेचा वार्षीक प्रगती अहवाल यावरुन संस्थांचा दर्जा, पात्रता व आवश्यकता ठरविण्याचा अधिकार शासनाचा राहील.

१३) उपरोक्त कला संस्थांना शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या सर्व आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

१४) शैक्षणीक गुणवत्ता वाढविण्यासाठी वरील अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा ते सुधारण्याचे अधिकार शासनास राहतील.

१५) उपरोक्त कला संस्था सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षा पासून कार्यान्वीत करण्याच्या संदर्भातील अतिरीक्त निर्देशांचे आदेश कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या स्तरावरुन तात्काळ निर्गमित करावेत.

१६) प्रस्तुत शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असुन त्यांचा संगणक सांकेतांक २०१००८१६२०२५१०००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रं. रा. दारसटवार)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी (नाशिक,सोलापूर,सातारा,बीड,उस्मानाबाद,परभणी,नांदेड, बुलढाणा,नागपूर,चंद्रपूर,भंडारा,गोंदिया, ठाणे,नाशिक,अहमदनगर,जळगांव, पुणे,सांगली)
५. मा. मंत्री, तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. वित्त विभाग (सेवा -९) व (व्यय -५), मंत्रालय, मुंबई -३२.
११. सर्व शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्था (कला संचालकामार्फत)
१२. निवड नस्ती (तांशि -६)

उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्रमांक:- एडिआर २०१०/(१८५/१०)तांशि-६
दिनांक :- १६ ऑगस्ट , २०१० चे सहपत्र

## विवरणपत्र 'अ'

### शैक्षणिक वर्ष २०१०-११ मध्ये नवीन कला संस्थां सुरु करण्याबाबत मान्यता दिलेल्या नवीन संस्था व अभ्यासक्रम दर्शविणारे विवरणपत्र

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | महाविद्यालयाचे नाव व पत्ता | मंजूर अभ्यासक्रम | प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | आदिवासी सेवा समिती, नाशिक | अपुर्व कला (चित्रकला) महाविद्यालय, त्र्यंबकेश्वर , जि. नाशिक | १) मुलभूत<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन) | १५<br>२५ |
| २ | रेणुकादेवी महिला सेवा समिती मालेगाव, कॅम्प, जि. नाशिक | एस.पी.उच(चित्रकला) महाविद्यालय, चांदवड, जि.नाशिक | १) मुलभूत<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन) | १५<br>२५ |
| ३ | श्री. दादासो दामोदर ठोंबरे, गुरुकुल हौसि, सोसायटी विद्या नगर ता. कराड, जि. सातारा | प्रथमेश कॉलेज ऑफ फाईन आर्ट, खामनोळी रोड, मंगळवेढा, ता. मंगळवेढा,जि. सोलापूर | १) मुलभूत<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन) | १५<br>२५ |
| ४ | प्रा. दशरथ बलदू सगरे संस्थापक, यशोदा शिक्षण संस्था, सातारा | यशोदा शिक्षण संस्थेचे कला महाविद्यालय, सातारा यशोदा नगर, गोडोली, हायवेलगत सातारा | १) मुलभूत,<br>२) आर्ट मास्टर, (अंशकालीन)<br>३) इंटेरियल डेकोरेशन<br>४) रेखा व रंगकला | १५<br>२५<br>१५<br>१५ |
| ५ | साईनाथ सेवाभावी संस्था बँक कॉलनी माजलगाव, जि. बीड | साईनाथ आर्ट मास्टर शिवाजीनगर नवीन बस स्थानकासमोर माजलगाव,जि. बीड | १) आर्ट मास्टर (सुट्टीतील)<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५<br>२५ |
| ६ | श्री. बाळासाहेब शिंदे ज्ञान वर्धिन शिक्षण संस्था सांजा रोड, २३३, के.व्ही,स्टेशन जवळ, उस्मानाबाद | स्वांतत्र्य सैनिक आर.के.शिंदे मास्टर कला महाविद्यालय, सांजा रोड, २३३, के.व्ही.स्टेशनजवळ ता.जि.उस्मानाबाद. | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| ७ | हायटेक एज्युकेशन ॲण्ड रिसर्च सोसायटी परभणी शिवाजी नगर, परभणी | मोहिनी कला महाविद्यालय, मोहिनी बिल्डींग शिवाजीनगर, परभणी-४३१४०१ | १) मुलभूत<br>२) इंटेरियल डेकोरेशन | १५<br>१५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | भारत जोडो युवा अकादमी C/V साने गुरुजी रुग्णालय किनवट, जि. नांदेड | सानेगुरुजी चित्रकला महाविद्यालय, किनवट, ता. किनवट, जि. नांदेड-४३१८०४ | १) मुलभुत | १५ |
| ९ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मा. शिक्षण प्रसारक मंडळ, पडसा, ता.माहुर, जि. नांदेड | पंचशिल कला महाविद्यालय, माहूर ता. माहूर ,जि. नांदेड | १) मुलभुत | १५ |
| १० | अमर मदन चितळे स्वामी विष्णूवाडी वार्ड क्र. १८, बुलढाणा | रविंद्रनाथ टागोर चित्रकला महाविद्यालय चिखली बुलढाणा | १) रेखा व रंगकला | १५ |
| ११ | राहुल विद्या प्रसारक मंडळ कळमेश्वर ता. कळमेश्वर जि. नागपूर | विपुल चित्रकला महाविद्यालय, श्रीनिकेतन कॉलनी, वार्ड क्र.१ कळमेश्वर, जि. नागपूर | १) मुलभुत | १५ |
| १२ | प्रोग्रेसिव्ह मागासवर्गीय शिक्षण संस्था, ५०८ विनोबाभावे, नगर, नागपूर-१७ | शरद पवार कला महाविद्यालय, सोमलवाडी, वर्धा रोड, नागपूर | १) इंटेरिअर डेकोरेशन<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन) | १५<br>२५ |
| १३ | उदय दे. टेकाडे, अभ्यग वैष्णवी साई श्री. जगदंबा शिक्षण संस्था, कोराडी जि. नागपूर | महालक्ष्मी जगदंबा महाविद्यालय, भगिनी मंडळ, ऑगी राणी चौक, सितावर्डी, नागपूर | १) आर्ट मास्टर<br>२) वस्त्रकाम | २५<br>१५ |
| १४ | संशोधन श्रमिक शैक्षणिक संस्था,मालडोंगरी ता. ब्रम्हपूरी, जि. चंद्रपूर | निशा चित्रकला व शिल्पकला महाविद्यालय ब्रम्हपूरी, जि. चंद्रपूर | १) मुलभूत | १५ |
| १५ | लक्ष्मी शिक्षण संस्था, व क्रिडा मंडळ, केसलवाडा / वाघ ता. लाखनी, जि. भंडारा | स्व.निर्धाव पाटील वाघाये चित्रकला महाविद्यालय, गडेगांव / लाखनी ता. लाखनी जि. भंडारा-४४१८०४ | १) मुलभूत<br>२) इंटेरियर डेकोरेशन | १५<br>१५ |
| १६ | श्री. संत गुलाबबाबा शिक्षण संस्था, घर क्र. ८१९, आंबेडकर वार्ड, गणशेपूर, भंडारा -४४१९०४ | श्री. संत गुलाबबाबा शिक्षण संस्था, घर क्र.८१९, आंबेडकर वार्ड, गणेशपूर, भंडारा-४४१९०४ | १) रेखा व रंगकला | १५ |
| १७ | परिवर्तन शिक्षण संस्था, वसेला, ता. पवनी , जि. भंडारा | परिवर्तन चित्रकला महाविद्यालय, भंडारा महात्मा फुले कॉलनी समोर, राष्ट्रीय महामार्ग, क्र. ६ नागपूर रोड, भंडारा | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| १८ | माधव बहुउद्देशिय शिक्षण संस्था, दवनीवाडा, ता.जि.गोंदिया | माधव बहुउद्देशिय शिक्षण संस्था, ता.जि. गोंदिया | १) मुलभूत<br>२) रेखा व रंगकला | १५<br>१५ |

उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्रमांक:- एडिआर २०१०/(१८५/१०)तांशि-६
दिनांक :- १६ ऑगस्ट , २०१० चे सहपत्र

## विवरणपत्र 'ब'

शैक्षणिक वर्ष २०१०-११ मध्ये मान्यताप्राप्त कला संस्थांमध्ये वाढीव अभ्यासक्रम सुरु करण्याबाबत मान्यता देण्यात आलेले वाढीव अभ्याक्रम व प्रवेश क्षमता दर्शविणारे विवरणपत्र

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | महाविद्यालयाचे नाव व पत्ता | मंजूर अभ्यासक्रम | प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|---|
| १ | सुवर्णकार आर्ट एज्युकेशन ट्रस्ट, अंबरनाथ (पु) जि.ठाणे | विद्यालंकार चित्रकला महाविद्यालय, जयशिवशंकर सोसायटी, प्लॉट नं. २५ जोंधळे पॉली टेक्नीक समोर, मयरे नगर अंबरनाथ (पु) जि.ठाणे | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| २ | नेहरु युवा मंडळ, अंदरसूल ता. येवला, जि. नाशिक | ग्रामीण चित्रकला महाविद्यालय, ता येवला, जि. नाशिक | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| ३ | श्री. संत गजानन महाराज ग्रामीण बहुउद्देशिय संस्था द्वारा - अध्यक्ष श्री. रामदास देवराम जाधव संगमनेर, ता. संगमनेर, जि. अहमदनगर | श्री. गजानन चित्रकला महाविद्यालय, के.जी.रोड, शेतकी फॉर्म अकोले, ता. अकोले, जि. अहमदनगर | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| ४ | खान्देश कॉलेज, एज्युकेशन सोसायटी, मू.जे.महाविद्यालय, परिसर, जळगाव | ओजस्विनी कला महाविद्यालय, तिसरा मजला, कॉमर्स बिल्डींग, मु.जे. महाविद्यालय परिसर, जळगाव | १) मूलभूत<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन)<br>३) इंटेरियर डेकोरेशन | १५<br>२५<br>१५ |
| ५ | खडकी शिक्षण संस्था, पुणे | श्रीमती. शकुंतला हेमराज मुथा, चित्रकला महाविद्यालय, खडकी, पुणे-३ | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| ६ | पी.ए.ईनामदार, १५, वेसली रोड, पुणे-१ | एम.सी.ई.सोसायटीचे स्कूल ऑफ आर्ट, आझम कॅम्पस, न्युमोदीखाना कॅम्प, पुणे | १) रेखा व रंगकला | १५ |
| ७ | कलापुष्प शिक्षण संस्था, १ यश अपार्टमेंट, चिंतामणीनगर, सांगली | राजारामबापू पाटील चित्रकला महाविद्यालय, ता.वाळवा जि.सांगली | १) मुलभूत<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन) | १५<br>२५ |
| ८ | साधना एज्यूकेशन सोसायटी, गडहिंग्लज, कडगाव रोड, ता.गडहिंग्लज जि. कोल्हापूर | साधना कला महाविद्यालय, साधना माळ, गडहिंग्लज, ता. गडहिंग्लज जि.कोल्हापूर | १) आर्ट मास्टर (सुट्टीतील)<br>२) रेखा व रंगकला | २५<br>१५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ९ | कुमावत सेवा संघ, २४५, सी, पापाची तिकिटे, कोल्हापूर | कलामंदिर महाविद्यालय, २४५, सी पापाची तिकिटे, कोल्हापूर | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| १० | कृष्णा फौंडेशन, मलकापूर, ता. कराड, जि. सातारा | कृष्णा कला महाविद्यालय, वाठार, ता. कराड, जि. सातारा, नॅशनल हायवे नंबर - ४, पुणे बेंगलोर रोड | १) रेखा व रंगकला | १५ |
| ११ | महात्मा गांधी मिशन १२, भाग्य नगर, नांदेड | महात्मा गांधी मिशनचे कॉलेज ऑफ फाईन आर्ट, औरंगाबाद | १) रेखा व रंगकला<br>२) आर्ट मास्टर (अंशकालीन)<br>३)इंटिरियर डेकोरेशन | १५<br>२५<br><br>१५ |
| १२ | श्री. संत कैकाडी महाराज शिक्षण संस्था, शंकरनगर, नगर रोड पाथर्डी | नारायण बाबा जाधव चित्रकला महाविद्यालय, शुभम कॉम्लेक्स नगर रोड, रोशनपुरा ता. जि. बीड | १) आर्ट मास्टर (अंशकालीन) | २५ |
| १३ | लोककल्याण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद | रविंद्रनाथ टागोर चित्रकला महाविद्यालय, नवा मोढा, परभणी | १) इंटेरियर डेकोरेशन | १५ |
| १४ | श्री. गुरुदेव प्रबोधन सेवाभावी संस्था, मोझरी, अमरावती | स्वामी विवेकानंद चित्रकला महाविद्यालय, मोझरी ता. तिवसा, जि. अमरावती. | १) मुलभूत<br>२) रेखा व रंगकला | १५<br>१५ |
| १५ | साई बहुउद्देशिय शैक्षणिक संस्था पुसद, जि. यवतमाळ | मोगरे चित्रकला महाविद्यालय, डुबेवार ले-आऊट, पुसद जि. यवतमाळ | १) मुलभूत | १५ |
| १६ | विदर्भ शिक्षण समिती मलकापूर हनुमान नगर, द्वारका नगर मलकापूर जि.बुलढाणा | विदर्भ चित्रकला महाविद्यालय, मलकापूर, द्वारका नगर, हनुमान नगर, मलकापूर, जि. बुलढाणा | १) मुलभूत<br>२) रेखा व रंगकला | १५<br>१५ |
| १७ | डॉ. बी.आर.आंबेडकर शिक्षण संस्था, हिंगणघाट | वसंत चित्रकला महाविद्यालय, बिडकर वार्ड, नागपूर रोड, हिंगणघाट, जि. वर्धा | १) रेखा व रंगकला | १५ |
| १८ | श्रीमती उमाबाई बहुउद्देशिय शिक्षण संस्था, गोंदिया | प्रोग्रेसिव्ह चित्रकला महाविद्यालय, रेल्वे डब्लिंग ग्राऊंड जवळ, गौतम नगर, सिव्हील लाईन, गोंदिया | १) इंटेरियर डेकोरेशन | १५ |